**शासकीय दूध शितकरण केंद्र, वैजापूर हे औरंगाबाद जिल्हा सहकारी दूध उत्पादक संघ मर्या. औरंगाबाद या संघास भाडेतत्वावर देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः एमएलके २०१३/प्र.क्र.२० /पदुम-१०**
मंत्रालय (विस्तार), मुंबई ४०० ०३२
दिनांक: १४ ऑगस्ट, २०१८

वाचा :- १) शासन निर्णय, कृषि व पदुम विभाग क्रमांक: एमएलके-२००१/ प्र.क्र.३७६/२००१/ पदुम-१०, दि.११/११/२००२
२) औरंगाबाद जिल्हा सहकारी दूध उत्पादक संघ मर्या. औरंगाबाद यांचे दि.७/११/२०१२ चे पत्र
३) आयुक्त , दुग्धव्यवसाय विकास यांचे क्र. आदुवि-९/न.क्र.९२/वैजापूर हस्तांतरण/ २०१५/१२७७, दिनांक २९/५/२०१५.
४) मुख्याधिकारी, नगर परिषद, वैजापूर यांचे क्र. नवैव/कावि/२०१७/२९६, दि.७/७/२०१७ रोजीचे पत्र.
५) शासन निर्णय, कृषि व पदुम विभाग क्रमांक: पदुम-२०१७/ प्र.क्र.१२६/पदुम-९ दि.२८/११/२०१७
६) शासनाचे समक्रमांकीत दिनांक ७/३/२०१८ चे पत्र.
७) औरंगाबाद जिल्हा सहकारी दूध उत्पादक संघ मर्या. औरंगाबाद यांचे दि.१५/३/२०१८ चे पत्र.

**प्रस्तावना :-**

शासकीय दूध शितकरण केंद्र, वैजापूर हे बंद असलेले शितकरण केंद्र औरंगाबाद जिल्हा सहकारी दूध उत्पादक संघ मर्या. औरंगाबाद या संघास हस्तांतरीत करण्याची विनंती संघाने संदर्भ क्र.२ येथील दि.७/११/२०१२ रोजीच्या पत्रान्वये केली होती. परंतु संदर्भ क्र.५ येथील दि.२८/११/२०१७ च्या शासन निर्णयान्वये बंद पडलेली व बंद पडण्याची शक्यता असलेली शासकीय दूध योजना/शितकरण केंद्रे PPP तत्वावर पुनरुज्जिवित करण्याबाबत निर्णय घेण्यात आल्यामुळे औरंगाबाद जिल्हा सहकारी दूध उत्पादक संघाची विनंती संदर्भ क्र.६ येथील दि. ७/३/२०१८ च्या पत्रान्वये अमान्य करण्यात आली होती. त्याबाबत औरंगाबाद जिल्हा सहकारी दूध उत्पादक संघांनी संदर्भ क्र.७ येथील दिनांक १५/३/२०१८ च्या पत्रान्वये बंद पडलेली व बंद पडण्याची शक्यता असलेली शासकीय दूध योजना/शितकरण केंद्रे PPP तत्वावर पुनरुज्जिवित करण्याबाबतची पुढील कार्यवाही पूर्ण होईपर्यंत शासकीय दूध शितकरण केंद्र, वैजापूर भाडे तत्वावर चालविण्यास देण्यास परवानगी देण्याबाबत विनंती केली आहे.

शासकीय दूध शितकरण केंद्र, वैजापूर हे सन २०११ पासून बंद पडलेले आहे. सदर शितकरण केंद्राची जमीन नगर परिषद, वैजापूर यांनी दि.२५/११/१९७८ रोजी खाजगी व्यक्तीकडून खरेदी करुन शितकरण केंद्राकरीता हस्तांतरीत केली आहे. नगर परिषद, वैजापूर यांनी संदर्भ क्र.४ येथील दि.७/७/२०१७ च्या पत्रान्वये वैजापूर शितकरण केंद्रास प्रत्यक्षात आवश्यक असलेली जमीन सोडून उर्वरीत जमीन नगर परिषद, वैजापूर यांना परत करण्याच्या अटीवर वैजापूर शितकरण केंद्राची जमीन दूध औरंगाबाद जिल्हा सहकारी दूध संघास हस्तांतरीत करण्यास संमती दिली आहे. शितकरण केंद्राची इमारत व मशिनरी शासनाच्या मालकीची आहे. परंतु सदर शितकरण केंद्र सन २०११ पासून विनावापर बंद अवस्थेत पडून आहे. त्यामुळे संदर्भ क्र.७ येथील पत्रान्वये

औरंगाबाद जिल्हा सहकारी दूध उत्पादक संघाने विनंती केल्यानुसार शितकरण केंद्र, वैजापूर हे सदर संघास भाडे तत्वावर चालविण्यास देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय :-

शासन या निर्णयान्वये शासकीय दूध शितकरण केंद्र, वैजापूर हे औरंगाबाद जिल्हा सहकारी दूध उत्पादक संघास, खालील अटी व शर्तीच्या अधिन राहून भाडेतत्वावर देण्यास मान्यता देत आहे.

१. वैजापूर शितकरण केंद्र हे औरंगाबाद जिल्हा सहकारी दूध उत्पादक संघाला भाडेतत्वानुसार हस्तांतरणाबाबत शासनाच्या संदर्भ क्र.१ येथील दि.११/११/२००२ रोजीच्या शासन निर्णयातील अटी औरंगाबाद जिल्हा सहकारी दूध उत्पादक संघावर बंधनकारक राहतील.

२. नगर परिषद, वैजापूर यांच्या संदर्भ क्रमांक ४ येथील पत्रान्वये दिलेल्या संमतीनुसार, वैजापूर शितकरण केंद्राच्या प्रत्यक्ष ( पूर्व बाजुने वैजापूर-नाशिक रस्त्यालगत १५५ (पूर्व-पश्चिम) व १६५ (दक्षिण-उत्तर) अशी एकूण २५,५७५ चौ.फूट ) जमीनीसह औरंगाबाद जिल्हा सहकारी दूध उत्पादक संघ मर्या,औरंगाबाद यांना भाडेपट्टीवर देण्यात येईल.

३. वैजापूर शितकरण केंद्राची वर नमूद केल्याप्रमाणे २५,५७५ चौ.फुट असलेली प्रत्यक्ष जमीन वगळून उर्वरित जमिन नगर परिषद, वैजापूर यांना परत करण्याबाबत आवश्यक ती कार्यवाही आयुक्त, दुग्धव्यवसाय यांनी करावी.

४. भविष्यात सदर शितकरण केंद्र व तेथील जमिनीची आवश्यकता शासनास भासल्यास, सदर शितकरण केंद्राचे पुनर्प्रत्यार्पण शासनाकडे करणे संघावर बंधनकारक राहील.

२. आयुक्त,दुग्धव्यवसाय विकास, मुंबई यांनी उपरोक्त प्रकरणी औरंगाबाद जिल्हा सहकारी दूध उत्पादक संघ मर्या. औरंगाबाद यांच्या समवेत वैजापूर शितकरण केंद्र भाडेतत्वावर देण्यासंबंधात आवश्यक तो करारनामा करण्याची कार्यवाही करावी व त्याबाबतची प्रत शासनास उपलब्ध करुन द्यावी.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८०८१४१७२३३२०७०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Kiran V Kurundkar

Digitally signed by Kiran V Kurundkar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Agriculture and ADF, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=6f89b7a82db2238fb7337a9a9b8e00b9c1a35b509d1f6850ddcc783bdb12090f, cn=Kiran V Kurundkar
Date: 2018.08.14 17:26:22 +05'30'

( किरण कुरुंदकर )
सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. मा.राज्यपाल यांचे सचिव, मुंबई.
२. मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा. विरोधी पक्ष नेता महाराष्ट्र विधानसभा/परिषद, विधानभवन, मुंबई.
४. मा. मंत्री (पदुम) यांचे खाजगी सचिव

५. मा.राज्यमंत्री (पदुम) यांचे खाजगी सचिव
६. आयुक्त दुग्धव्यवसाय विकास, महाराष्ट्रराज्य, वरळी मुंबई
७. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी दूध महासंघ, गोरेगाव, मुंबई
८. सहनिबंधक, सहकारी संस्था (दुग्ध) मुंबई
९. प्रादेशिक दुग्धव्यवसाय विकास अधिकारी औरंगाबाद
१०. विभागीय उपनिबंधक सहकारी संस्था (दुग्ध) औरंगाबाद
११. महालेखापाल, महाराष्ट्र -१ (लेखा परिक्षा) मुंबई
१२. महालेखापाल, महाराष्ट्र -२ (लेखा व अनुज्ञेयता) नागपूर
१३. वित्त विभाग (व्यय-२), मंत्रालय, मुंबई.
१४. नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
१५. मुख्याधिकारी, नगर परिषद, वैजापूर
१६. जिल्हा दुग्ध विकास विकास अधिकारी औरंगाबाद
१७. सहाय्यक निबंधक सहकारी संस्था (दुग्ध) औरंगाबाद
१८. व्यवस्थापकीय संचालक, औरंगाबाद जिल्हा सहकारी दूध उत्पादक संघ मर्या.औरंगाबाद
१९. निवडनस्ती.